# जे झालं ते झालं

## घरकाम करून पाहण्याची इच्छा
## असलेल्या माणसाची गोष्ट



**लेखिका : वाँडा गॅग**
("मिलियनस् ऑफ कॅटस्" ह्या प्रसिद्ध पुस्तकाची लेखिका)
मराठी अनुवाद : तृप्ती कर्णिक

माझ्या शेतकरी कष्टकरी पूर्वजांना समर्पित

# जे झालं ते झालं

## घरकाम करून पाहण्याची इच्छा असणाऱ्या माणसाची गोष्ट



आज मी तुम्हाला एक फारच जुनी गोष्ट सांगणार आहे. ही गोष्ट मी लहान असताना माझ्या आजीकडून ऐकली आहे. ती जेव्हा लहान होती तेव्हा तिच्या आजोबांनी तिला ही सांगितली होती. आणि आजोबा (बोहेमिया मधल्या एका छोट्या शेतकरी कुटुंबामध्ये ते वाढले होते) जेव्हा लहान होते तेव्हा त्यांची आई ही गोष्ट त्यांना सांगत असे. आणि त्यांच्या आईने ही कुणाकडून ऐकली हे काही मला माहीत नाही पण तुम्हाला अंदाज आला असेलच की ही किती जुनी गोष्ट आहे. आणि माझी आजी मला जशी ही गोष्ट सांगायची अगदी तशीच्या तशी मी आज तुम्हाला ऐकवणार आहे.

# जे झालं ते झालं

## घरकाम करून पाहण्याची इच्छा असलेल्या माणसाची गोष्ट



फ्रिट्झल नावाचा एक माणूस असतो. त्याच्या बायकोचं नाव असतं लिझी. त्यांना किंडली नावाची छोटी गोड मुलगी असते.



त्यांच्या कुत्र्याचं नाव असतं स्पिट्झ.
एक गाय, दोन बकऱ्या, तीन डुक्कर आणि बारा बदकं एवढीच काय ती त्यांची संपत्ती.
आपल्या छोट्याशा शेतात त्यांनी घर बांधलं होतं आणि त्याच शेतात ते मेहनत करायचे.



फ्रिट्झल जमिनीची नांगरण करायचा, बी पेरायचा, त्यातील तण उपटून काढायचा. गुरांसाठी वैरण कापून ती वाळवायचा आणि उन्हात वाळवून त्याचे भारे करायचा. दिवसभर तो शेतात भरपूर राबायचा.



इकडे लिझी घराची स्वच्छता करायची, जेवणाबरोबर सूप बनवायची, लोणी काढायची, धान्याचं कोठार नीट ठेवायची, बाळाला सांभाळायची. तिलाही दिवसभर भरपूर काम असायचं.

दोघंही प्रचंड मेहनत करायचे. पण फ्रिट्झलला मात्र वाटायचं की त्याची कामं प्रचंड कष्टाची आहेत. एके दिवशी संध्याकाळी तो घरी आला आणि थोडं बसून चेहऱ्यावरचा घाम लाल रुमालाने पुसत म्हणाला, “आई गं! आज असलं कडक ऊन होतं म्हणून सांगू. आणि मी किती काबाडकष्ट करतो. लिझी, पुरुष किती कामं करतात हे तुला नाही समजायचं! तू जी कामं करतेस ती आम्हा पुरुषांना कराव्या लागणाऱ्या कष्टापुढे काहीच नाहीत.”

“दोघांचीही कामं तितकीच अवघड आहेत,” लिझी म्हणाली.

“काय? दोघांचीही कामं तितकीच अवघड?,” फ्रिट्झल ओरडला. “दिवसभर घरातल्या घरात हिंडत तुझी काम आरामात चालू असतात. छे..छे..घरकाम अजिबातच अवघड नाही.”



"बरं बाबा, तू जसं म्हणशील तसं," लिझी म्हणाली. "मग उद्या आपण आपल्या कामांची अदलाबदल करून पहायची का? मी शेतात जाईन. गवत कापून आणीन. तू घरी रहा आणि मस्त घरात हिंडत फिरत आरामात कामं कर. बघ, करून बघायला आवडेल का हे तुला?"



फ्रिट्झलला ही कल्पना फारच आवडली. मस्त गवतावर झोपून किंडलीकडे लक्ष ठेवायचं, छान गारव्यात बसून लोणी घुसळायचं, जेवणासाठी थोडे सॉसेजस तळायचे आणि दोन-चार वाट्या सूप करायचं. व्वा! किती सोपी कामं आहेत ही! मला नक्की करायला आवडतील.



दुसऱ्या दिवशी लिझी पहाटे लवकर उठली. पाणी आणि विळा घेऊन ती झपाझप शेताकडे निघाली.

आणि इकडे फ्रिट्झलचं काय बरं चालू होतं? तो स्वयंपाकघरात नाश्त्यासाठी सॉसेजेस तळत होता. चुलीवरच्या तव्यातल्या सॉसेजेसचा खमंग वास सुटला होता. आणि फ्रिट्झल दुसरीकडे सुखद विचारात गढून गेला होता.

“ग्लासभर सफरचंदाचा रस मिळाला तर?,” तो स्वत:शी बोलत होता. “सॉसेजेसबरोबर ज्यूस कसला भारी लागेल.”

विचार आल्याबरोबर तो लगेचच उठला.

फ्रिट्झलने सॉसेजेसचा पॅन चुलीवरच ठेवला आणि खालच्या कोठीच्या खोलीकडे निघाला. तिथे एका मोठ्या पिंपामधे भरपूर सफरचंदाचा ज्यूस साठवला होता.



त्याने रसाच्या पिंपाचं बुच जोराने ओढलं आणि ग्लासमधे पडत असलेला फेसाळलेला रस तो अगदी भान हरपून पाहू लागला.

अरे! स्वयंपाकघरातून हा भांड्याचा आदळण्याचा आणि दार आपटण्याचा आवाज का बरं येतोय? अरे देवा! आपला कुत्रा स्पिट्झ तर सॉसेजेसच्या वासाने तिकडे गेला नाही ना? फ्रिट्झल घाईने पळतच पायऱ्या चढून वर आला. पहातो तर काय सगळीकडे सॉसेजेस पसरले होते आणि त्याच्यावर उड्या मारताना स्पिट्झ दाराला धडकत होता.

फ्रिट्झलने स्पिट्झला हाड
हाड ओरडून हाकलण्याचा
खूप प्रयत्न केला.





पण कुत्राच तो, तो कसला ऐकतोय! फ्रिट्झल त्याच्यामागे पळू लागला. स्पिट्झ आणखी जोराने पळू लागला आणि फ्रिट्झलनेही त्याला हाकलण्यासाठी वेग वाढवला. शेवटी एकदाचा स्पिट्झ लांब पळून गेला तेव्हा कुठे फ्रिट्झल थांबला.



“ठीक आहे, जे झालं ते झालं,” पळून दमल्यामुळे घामाने डबडबलेला चेहरा लाल हातरुमालाने पुसत खांदे उडवत फ्रिट्झल म्हणाला.



पण इकडे सफरचंदाच्या रसाचं काय? त्याने पिंपाचं बुच लावलं होतं की नाही? अरे देवा, ते करायचं तर त्याच्याकडून राहूनच गेलं होतं. त्याने ते बेपर्वाईने कुठेतरी फेकलं असावं.

धावत पळत घाईने फ्रिट्झल खालच्या कोठीच्या खोलीत आला. पण तोपर्यंत उशीर झाला होता.



खाली येऊन तो पाहतो तर काय, त्याच्या पेल्यावरूनच नव्हे तर खोलीभर पिंपातला रस वाहत होता. खोलीभर पसरलेला तो रस पाहून डोकं खाजवत फ्रिट्झल म्हणाला, “ठीक आहे, जे झालं ते झालं.”

चला, आता ताक घुसळून लोणी काढायला हवं. फ्रिट्झलने एका मोठ्या भांड्यामध्ये भरपूर साय ओतून घेतली, तो झाडाच्या सावलीत आला आणि ताक घुसळू लागला. बाजूला त्याची छोटी किंडली पिवळ्या-पांढऱ्या फुलांसोबत खेळत होती. निळंशार आकाश, सूर्याची सोनेरी किरणं आणि वाऱ्यावर डोलणारी फुलं असं रमणीय वातावरण होतं.

“किती सुंदर वातावरण आहे! चला, आता जरा कुठे पाय पसरून थोडा आराम करता येईल,” लोणी तयार झाल्यावर  फ्रिट्झल म्हणाला.



“अरे देवा! पण गाईचं काय? तिने सकाळपासून पाण्याचा थेंबही घेतला नसेल. गरीब, बिच्चारी गाय! मी तर तिला पूर्ण विसरूनच गेलो.”



मग पाण्याची बादली घेऊन फ्रिट्झल भराभर गोठ्याकडे आला. गरीब बिचारी गाय.. खरंच तहानेने व्याकूळ झाली होती. पाण्याअभावी तोंड सुकल्यामुळे ती सारखी जीभ बाहेर काढत होती.



गाईकडे नजर टाकल्यावरच कळत होतं की ती भुकेनी कासावीस झाली आहे. चरण्यासाठी म्हणून फ्रिट्झलने तिला गोठ्यातून कुरणात हिरव्या गवतावर आणले.

पण थांबा! गाईला बाहेर कुरणावर चारायला नेलं तर छोट्या किंडलीकडे कोण बरं लक्ष देणार? नाही, त्यापेक्षा गाईला मैदानात न्यायलाच नको. त्याऐवजी तिला छतावर ठेवलं तर? काय? छत? हो हो. छतावर. फ्रिट्झलच्या घराचे छपर कौलाच्या ऐवजी गवत आणि मातीने शाकारले होते. त्यामुळे त्यावर हिरवेगार गवत आणि फुलं उगवली होती.

आणि गाईला छतावर चढवणं तुम्हाला वाटतं तितकं अवघड अजिबातच नव्हतं.



फ्रिट्झलचं घर टेकडीच्या चढाला लागून होतं. छोटीश्या डोंगरावरच्या छोट्याश्या झोपडीवरच्या हिरव्यागार गवतानी शाकारलेल्या छतावर जायला छान वाट होती. तिथून गाईला तो छतावर अगदी सहज घेऊन गेला.

गाईलाही छतावर फारच आवडलं. तिने तिथलं गवत चरायला आनंदाने सुरुवात केली. ते पाहून फ्रिट्झल लगेच लोणी काढायला माघारी आला.



अरे देवा! तिकडे झाडाखाली पाहतो तर काय. किंडली लोण्याच्या भांड्यावर चढत होती. त्यामुळे ते भांडं एका बाजूला कलंडलं होतं. लोणी भांड्यातून खाली ठिबकत होतं.



आणि तेवढ्यात किंडली
घसरून खाली पडली.



पाठोपाठ भांडंही गवतात पडलं.



भांड्यातून सगळं लोणी आणि ताक किंडलीच्या अंगावर सांडलं.

“सगळं लोणी वाया गेलं,” फ्रिट्झल गवतावर सांडलेल्या लोण्याकडे पाहत खेदाने म्हणाला. पण लगेचच खांदे उडवत तो म्हणाला, “ठीक आहे. जे झालं ते झालं.”

त्याने ताक-लोण्याने बरबटलेल्या किंडलीला उचललं आणि वाळण्यासाठी उन्हात ठेवलं. पण पहातो तर काय, सूर्य डोक्यावर आला होता. जेवणाची वेळ झाली होती आणि अजून खायला काहीही तयार नव्हतं. लिझी जेवायला कधीही घरी येऊ शकते.

फ्रिट्झल पळतच बागेत आला. बागेतून त्याने कांदे-बटाटे, कोबी-गाजर, बीट, शेंगा, मुळे आणि पालेभाज्या गोळा केल्या.

“सगळं थोडं थोडं शिजवून त्याचं चविष्ट सूप करूयात.” फ्रिट्झल बागेतून निघताना म्हणाला. त्याच्या दोन्ही हातात इतक्या भरभरून  भाज्या होत्या की बागेचं फाटक बंद न करताच तो घराकडे आला.



मग तो भाज्या निवडायला,

सोलायला आणि कापायला

किचनमधल्या स्टूलवर बसला.



तेवढ्यात बाहेरचा मोठा आवाज ऐकू आला. तो ताडकन उभा झाला आणि म्हणाला, “छतावर गाय चरत चरत अगदी उजवीकडच्या कडेला आलेली दिसतेय. बापरे, घसरून खाली नाकावर पडली तर चांगलाच मार लागेल तिला.”

फ्रिट्झल मोठी दोरी घेऊन घाईघाईने छतावर चढला. आणि त्याने काय केलं हे ऐकता आहात ना तुम्ही.

दोरीचं एक टोक त्याने गाईच्या पोटाला गुंडाळून घट्ट बांधलं. आणि उरलेली दोरी त्याने चिमणीच्या धुरांड्यातून खाली टाकली. खाली येऊन त्याने ती दोरी चुली वरून अजून खेचली.

आणि मग त्याने दोरीचं दुसरं टोक स्वत:च्या कमरेला घट्ट करकरचून बांधलं. विश्वास नाही ना बसत? पण त्याने हे अगदी असंच केलं!



"चला, आता निदान गाय खाली पडण्याची तरी भीती नाही." आणि मजेत शिळ घालत तो कामाला लागला.





फ्रिट्झलने चुलीत लाकडं घातली आणि त्यावर सूपसाठी मोठं भांडं ठेवलं व त्यात भरपूर पाणी ओतलं.

“चला, निदान शेवटाला तरी जे ठरवलं आहे तसं होतंय,” फ्रिट्झल म्हणाला. “आता लवकरच चविष्ट सूप तयार होईल.”



“आता पाण्यात भाज्या टाकूयात.”
म्हणत त्याने भाज्या टाकल्या.

“आता थोडा मीठ-मसाला घालतो.” असं म्हणत त्याने मीठ-मसाला टाकला.

“चला, आता चूल पेटवतो.”

आता चुलीत जाळ पेटवणार तेवढ्यात धडाम धूम आवाज झाला. छतावरून गाय खाली कोसळली त्याबरोबर इकडे फ्रिट्झल चिमणीच्या मधून वर ओढला गेला. बिच्चारा फ्रिट्झल....मधोमध लटकला गेल्यामुळे त्याला ना धड खाली उतरता येत नव्हतं की वर चढून जाता येत नव्हतं.



थोड्याच वेळात एका हातात पाण्याची कळशी आणि दुसऱ्या हातात विळा घेऊन लिझी शेतातून घरी परत आली.

“अरे, हे काय? कोण बरं छतावरून लटकते आहे. गाय तर नाही ना..अरेरे..डोळे वर गेलेले आणि तोंडातून फेस येत असलेली अर्धमेली गाय आपलीच आहे की.”

लिझीने एकही मिनिट न दवडता विळ्याने दोरी पटकन कापून टाकली. गाय धपकन खाली पडली आणि कशीबशी चार पायावर उभी राहिली. गाईला काही झालं नाही ही देवाचीच कृपा म्हणायला लागेल.



तेवढ्यात लिझीला बागेचं फाटक उघडं दिसलं. बागेत डुक्करं, बकऱ्या आणि बदकं मजेत उनाडत होती. बाग मात्र त्यांनी पार उजाड करून टाकली होती.



लिझी थोडी पुढे आली. आणि पाहते तर काय? सगळं लोणी खाली सांडलेलं होतं. तिकडे तिला लोण्याने आणि ताकाने बरबटलेली, अर्धवट वाळलेली, उन्हात बसलेली किंडली होती.



लिझी पळतच पुढे आली. स्पिट्झ गवतावर गडबडा लोळताना दिसला. सगळे सॉसेजेस फस्त केल्याने त्याचं पोट फुगलं होतं.



तिथून लिझी घाईने घराकडे आली. कोठीच्या खोलीतून आत शिरली. बघते तर काय? खोलीतल्या जवळजवळ अर्ध्या पायऱ्यापर्यंत सफरचंदाचा रस भरून राहिला होता.



किचनमधेही काही गोंधळ तर झाला नाही ना हे पाहायला ती वर आली. पहाते तर काय तिला सगळीकडे भाज्यांची सालं, तुकडे, ताटल्या, पातेली अस्ताव्यस्त फेकलेली दिसली.

तेवढ्यात तिची नजर चुलीकडे गेली. सूपच्या भांड्यावर काही तरी तरंगत होतं. पाण्यात दोन्ही हात मारत, पायाने लाथा झाडत कुणीतरी कण्हत-विव्हळत होतं.

“अरे देवा, इथे कोण आहे?” ती जोरात ओरडली. आपण गाईला वाचवलं तेव्हा आत काहीतरी गडबड झाली हे तिच्या अजिबात ध्यानीमनी नव्हतं. गाईला वाचवण्यासाठी दोर कापला तेव्हा गरीब बिच्चारा फ्रिट्झल चिमणीमधून चुलीवर सूपसाठी ठेवलेल्या पाण्याच्या भांड्यामध्ये धपकन पडला गेला.

लिझीने ताबडतोब त्याचे दोन्ही हात ओढले, दोन्ही पाय वर खेचले आणि बाहेर काढलं.



“आई गं! डोक्यावर कोबीच्या पानांची टोपी, खिशात सेलेरीची पानं, कानामधे कोथिंबीर अडकलेली, पाण्याने चिंब भिजलेला अशा अवतारातला घाबरलेला, गुदमरलेला, अर्धमेला झालेला तो माणूस म्हणजे तिचा फ्रिट्झल होता.

“काय हे फ्रिट्झल?,” लिझीने विचारलं. “तू अशा पद्धतीने घरातली कामं करतोस का?”

“लिझी, तू बरोबर आहेस. तुझं काम अजिबातच सोपं नाही आहे.” फ्रिट्झल कळवळून म्हणाला.

“अरे, सुरवातीला थोडं अवघड जाईल. पण उदयापासून तू चांगलं करशील.” लिझीने समजावलं.

“छे, छे,” फ्रिट्झल म्हणाला. “जे झालं ते झालं. माझी घरकामाची हौस फिटली आहे. लिझी, प्लीज मला उदयापासून शेतकाम करायला जाऊदे. मी ह्यापुढे तुझं काम माझ्या कामापेक्षा सोपं आहे असं कधीही म्हणणार नाही.”

“ठीक आहे,” लिझी म्हणाली. “तुला हे पटलं असेल तर आपलं आयुष्य स्वस्थ आणि आनंदी होईल.”

पुढे कायम ते छान मजेत राहिले.



